**केंद्र शासन पुरस्कृत जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाच्या युआयडीएसएसएमटी उपभियानांतर्गत गोंदिया नगरपरिषदेसाठी मंजूर भुयारी गटार योजनेची अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः युआयडी-२०१३/सं.क्र.२७४/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: १८ मार्च, २०१५

**वाचा -**

**१) केंद्रीय शहरी विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक के-१४०११/२८/२००६-युडी-१, दि.३०/०३/२०१२.**
**२) केंद्रीय शहरी विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक के-१४०११/१५/२०१३-युडी-१, दि.१८/०६/२०१३.**
**३) मुख्याधिकारी, गोंदिया नगरपरिषद यांचे पत्र क्र. नपगो / बांधकाम / ८१२ / १३, दि.१५.१०.२०१३**
**४) शासनाचे पत्र क्रमांक-युआयडी-२०१३/संक्र.२७४/नवि-३३, दिनांक ११/०९/२०१४.**
**५) अध्यक्ष, नगर परिषद गोंदिया यांचे पत्र क्रमांक नपगो/अध्यक्ष/२०१४, दि.२५/०९/२०१४**

**प्रस्तावना -**

केंद्र शासन पुरस्कृत जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाच्या UIDSSMT या उपभियानांतर्गत गोंदिया नगरपरिषदेची रु. ८२.३३ कोटी किंमतीची भुयारी गटार योजना दि. ३१/०३/२०१२ रोजी मंजूर झालेली होती. त्या अनुषंगाने सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य शासनाचा पहिल्या हप्त्याचा निधी म्हणून अनुक्रमे रूपये ३२.९३ कोटी व रु. ४.१८ कोटी वितरीत करण्यात आला होता. गोंदिया नगरपरिषदेच्या सर्वसाधारण सभेने दि. ६/०८/२०१२ रोजीच्या बैठकीतील ठराव क्रमांक ०१ (ब) अन्वये सदर भुयारी गटार योजना गोंदिया नगरपरिषदेमार्फत राबविण्याबाबत ठराव केलेला होता.

तथापि योजना कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने निविदा प्रक्रिया इत्यादी बाबी पूर्ण न करता सदरहू नगरपरिषदेने मंजूर योजनेत सुधारणा करून सुधारित योजना केंद्र शासनाच्या मान्यतेस्तव सादर केली होती. त्या अनुषंगाने केंद्र शासनाने दि.१८/०६/२०१३ रोजी गोंदिया नगरपरिषदेच्या रु. १२५.७२ कोटी किंमतीच्या सुधारित भुयारी गटार योजनेस मंजुरी दिलेली आहे.

तथापि सुधारीत योजनेच्या मंजूरी नंतर सदरहू सुधारीत योजनेची अंमलबजावणी कोणत्या यंत्रणेमार्फत केली जावी याबाबत नगरपरिषदेकडून योग्य तो निर्णय घेण्यात आलेला नाही.

दिनांक २०/०८/२०१३ रोजी मा. मंत्री पाणी पूरवठा व स्वच्छता विभाग यांच्याकडे झालेल्या बैठकीत, सदरहू भुयारी गटार योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्याबाबत चर्चा झाली असता, त्या अनुषंगाने नगरपरिषदेने ठराव करण्याबाबतचा निर्णय झाला होता व असा ठराव प्राप्त झाल्यावर सदर योजना राबविणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास फायदेशीर ठरेल किंवा कसे

याबाबत पडताळणी करून आवश्यक प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळासमोर ठेवण्याबाबत ठरले होते. तदनंतर मुख्यअभियंता, (नागरी व ग्रामीण) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी क्र. मजिप्रा /मु.अ. (नावग्रा) / तांशा-१/२९८३ दिनांक २७/०८/२०१३ व मजीप्रा / नावग्रायोमंना/ तांशा-३ /२३११/२०१३ दिनांक ३०/०८/२०१३ च्या पत्रान्वये सदरहू बैठकीतील निर्णयानुसार नगरपरिषदेचा ठराव करण्याबाबत नगरपरिषदेस विनंती केली आहे.

तथापि त्या अनुषंगाने कार्यवाही न करता संदर्भाधीन क्रमांक ३ च्या मुख्याधिकारी यांच्या पत्रान्वये गोंदिया नगरपरिषदेकडील कर्मचारी व अधिकाऱ्यामधील तांत्रिक क्षमतेचा अभाव व इतर काही कारणांमुळे सदर योजना नगरपरिषदेकडून २ वर्षात पूर्ण होणे अवघड असल्यामुळे सदर योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण वा तत्सम यंत्रणेकडे वर्ग करण्याबाबत नगरपरिषदेने क्र. नपगो/बांधकाम/८१२/१३ दि. १५/१०/२०१३ रोजीच्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

त्या अनुषंगाने शासनाने सदर योजनेच्या तांत्रिक व आर्थिक बाबींची पडताळणी करून पुढील कायदेशीर कार्यवाही करण्याबाबत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना दिनांक २१/११/२०१३ च्या पत्रान्वये कळविले होते. त्या अनुषंगाने सदरहू प्रकरणी तातडीने कार्यवाही करण्याबाबत नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत गोंदिया नगरपरिषदेस वेळोवेळी सूचीत करूनही आवश्यक कार्यवाही नगरपरिषदेने न केल्यामुळे मंजूर प्रकल्प कार्यान्वित होऊ शकलेला नाही.

दरम्यान सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या पत्र क्रमांक मजीप्रा/सस/तांशा-१/७६५(अ) /८९ दि. २८/०१/२०१४ रोजी च्या पत्रान्वये मा. मंत्री पाणी पूरवठा यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २०/०८/२०१३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार गोंदिया नगरपरिषदेने वारंवार स्मरण करूनही अद्याप ठराव पारित केला नसल्याचे नमूद करुन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत सदर योजना प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार किंवा पूर्ण ठेव तत्वावरील योजना म्हणून कार्यान्वयन करावयाचे असल्यास त्या करीता प्रचलित शासन निर्णयान्वये / परिपत्रकानुसार लागू होणारे शुल्क नगरपरिषदेने अदा करण्याबाबत ठराव करावा व अनुषंगिक करार ही करावा. योजनेची दैनंदिन देखभाल दुरूस्ती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत केले जाणार नाही, असे कळविण्यात आलेले आहे.

त्याअनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सदरहू प्रस्तावाच्या अनुषंगाने योग्य निर्णय घेण्याबाबत गोंदिया नगरपरिषदेस,नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने दिनांक १८/०३/२०१४ रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आले होते. तथापि प्रकल्प कार्यान्वित करण्याबाबत गोंदिया नगरपरिषदेकडून कोणताही निर्णय घेण्यात आलेला नाही.

अध्यक्ष, गोंदिया नगरपरिषद यांनी नगरपरिषद प्रशासन संचालनालयास पाठविलेल्या दि. २६/०४/२०१४ रोजीच्या पत्रान्वये भुयारी गटार योजनेचे कार्यान्वयन नगरपरिषदेमार्फत करण्यास दि. २६/०४/२०१४ रोजीच्या ठराव क्र. १५ अन्वये मंजुरी देण्यात आल्याचे कळविले आहे. तथापि मुख्याधिकारी, गोंदिया नगरपरिषद यांनी नगरपरिषद प्रशासन संचालनालयास लिहलेल्या दि. २ मे

२०१४ रोजीच्या पत्रान्वये नगरपरिषदेची आर्थिक स्थिती असमाधानकारक असल्यामुळे सदर योजना राज्य शासनानेच पूर्ण करून नगरपरिषदेस हस्तांतरित करण्याबाबत सुचविले होते.

गोंदिया नगरपरिषदेतील उपलब्ध तांत्रिक कर्मचारी, अधिकाऱ्यांची कमतरता लक्षात घेता सद्यस्थितीत नगरपरिषदेकडून योजनेची अंमलबजावणी होणे शक्य होणार नाही, व नागरीक मूलभूत सेवेपासून वंचित राहतील ही वस्तुस्थिती आहे. अशा परिस्थितीत केंद्र शासन पुरस्कृत योजना लवकरात लवकर पूर्णत्वास जाऊन नागरिकांना विहित पायाभूत सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने सदर भुयारी गटार योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्याबाबत गोंदिया नगरपरिषदेस महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नागरी अधिनियम, १९६५ च्या कलम ३१२ (अ) अन्वये निदेश का देण्यात येउ नयेत याबाबत नगरपरिषद गोंदिया यांच्याकडून अभिवेदन मागविण्यात आले होते.

सदर अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक ५ च्या पत्रान्वये अध्यक्ष, गोंदिया नगरपरिषद यांचे अभिवेदन शासनास प्राप्त झाले होते. त्याअनुषंगाने उपरोक्त प्रमाणे नमूद वस्तुस्थिती व अध्यक्ष गोंदिया नगरपरिषद यांचेकडून प्राप्त अभिवेदन विचारात घेउन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

केंद्र शासन पुरस्कृत जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाच्या युआयडीएसएसएमटी उपभियानांतर्गत गोंदिया नगरपरिषदेसाठी मंजूर भुयारी गटार योजना ही खालीलप्रमाणे नमूद अटींच्या अधीन राहून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्याचे निदेश महाराष्ट्र नगरपरिषदा,नगरपंचायती व औद्योगिक नागरी अधिनियम,१९६५ च्या कलम ३१२(अ) अन्वये देण्यात येत आहेत.

- युआयडीएसएसएमटी योजनेअंतर्गत मंजूर गोंदिया नगरपरिषदेची वाढीव पाणीपुरवठा योजनचे कार्यान्वयन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात यावे व सदर प्रकल्पासाठीचा नगरपरिषद हिश्याचा निधी गोंदिया नगरपरिषदेमार्फत उभा करण्यात यावा.
- महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत योजना कार्यान्वित होण्यासाठी आवश्यक शुल्क अदा करण्याच्या दृष्टीने १३ वा वित्त आयोग व इतर अनुदानातून नगरपरिषद प्रशासन संचालनालय स्तरावरून निधी परस्पर कपात करून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे शुल्क अदा करण्यात यावे.
- केंद्र शासन पुरस्कृत जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत युआयडीएसएसएमटी या उपभियानांतर्गत अंतर्भूत करण्यात आलेल्या सुधारणा (रिफॉर्म्स) नुसार सदर योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांचा देखभाल दुरुस्तीचा खर्च हा गोंदिया नगरपरिषदेने नागरिकांकडून कर स्वरुपात गोळा करुन सदर निधी महाराष्ट्र जीवन

प्राधिकरणाकडे वर्ग करण्याची कार्यवाही करावी. त्या अनुषंगाने देखभाल व दुरुस्ती महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१८१६३०२६६४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2015.03.18 16:40:54 +05'30'

**( सीमा ढमढेरे )**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री नगरविकास यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव
५. मा.प्रधान सचिव पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
६. आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई
७. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
८. विभागीय आयुक्त,नागपूर विभाग,नागपूर
९. जिल्हाधिकारी,गोंदिया
१०. मुख्याधिकारी,गोंदिया नगरपरिषद,जि.गोंदिया.
११. निवड नस्ती-नवि-३३